असा. क्र. १६८ रजिस्टर्ड नं. टीईसीएच/४७-३०३/एमबीआय/२००३-०५

# महाराष्ट्र शासन राजपत्र

**असाधारण**

**प्राधिकृत प्रकाशन**

**सोमवार, जून ३०, २००३/आषाढ ९, शके १९२५**

**स्वतंत्र संकलन म्हणून फाईल करण्यासाठी या भागाला वेगळे पृष्ठ क्रमांक दिले आहेत.**

# भाग चार-ब

**महाराष्ट्र शासनाने महाराष्ट्र अधिनियमांन्वये तयार केलेले (भाग एक, एक-अ आणि एक-ल यांमध्ये प्रसिद्ध केलेले नियम व आदेश यांव्यतिरिक्त) नियम व आदेश.**

## गृह विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ३० जून २००३

### आदेश

**मुंबई दारूबंदी अधिनियम, १९४९.**

क्रमांक विसंप्र. १०९४/१०८८९०/ (आम्वा-२३५)/इएक्ससी-३.—मुंबई दारूबंदी अधिनियम, १९४९ च्या कलम १३९ च्या पोट-कलम (१) सह पोट-कलम (२) याद्वारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा आणि त्याबाबतीत त्यास समर्थ करणाऱ्या इतर सर्व अधिकारांचा वापर करून याबाबत यापूर्वी निर्गमित करण्यात आलेले आदेश क्रमांक बीपीए. १२९३/२२९/इएक्ससी-३, दिनांक १४ जुलै १९९३, क्रमांक बीपीए. १२९३/२२९/इएक्ससी.-३, दिनांक ११ ऑक्टोबर १९९३, क्रमांक बीपीए. १२९३/२२९/इएक्ससी-३, दिनांक २९ डिसेंबर १९९३, क्रमांक बीपीए. १२९४/२२९/इएक्ससी-३, दिनांक ३० जुलै १९९४, क्रमांक बीपीए. १२९४/२२९/इएक्ससी-३, दिनांक २३ नोव्हेंबर १९९४, क्रमांक बीपीए. १२९४/२२९/इएक्ससी-३, दिनांक १ जानेवारी २००१, क्रमांक विसप्र. १०९४/१०८८९०/इएक्ससी-३, दिनांक १९ सप्टेंबर २००२, आणि

क्रमांक विसप्र. १०९४/१०८८९०/ (आश्वा-२३५) /इएक्ससी-३, दिनांक २१ सप्टेंबर २००२, अधिक्रमित करून महाराष्ट्र शासन पुढीलप्रमाणे आदेश देत आहे, ते असे :—

१. **संक्षिप्त नाव व प्रारंभ.**—या आदेशास " मुंबई दारूबंदी (ग्रामपंचायत किंवा ग्रामसभा किंवा महिला सामाजिक संघटनांनी ठराव पारित केल्यामुळे अथवा गावातील किंवा नगरपरिषद/महानगरपालिकेच्या वार्डातील मतदारांनी निवेदन दिल्यामुळे अनुज्ञप्ती बंद करणे) आदेश, २००३ " असे संबोधण्यात यावे.

२. **व्याख्या.**—या आदेशात संदर्भानुसार दुसरा अर्थ अपेक्षित नसेल तर,—

(क) " अधिनियम " म्हणजे, मुंबई दारूबंदी अधिनियम, १९४९ (१९४९ चा मुंबई २५) ;

(ख) " महानगरपालिका " म्हणजे, मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ (१९४९ चा मुंबई ५९), मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८ (१८८८ चा मुंबई ३), किंवा नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४९ (सी.पी. आणि १९५० चा बेरर २) यामध्ये अंतर्भूत असलेली महानगरपालिका ;

(ग) " ग्रामसभा " म्हणजे मुंबई ग्रामपंचायत (ग्रामसभा) नियम, १९५९ (१९५९ चा मुंबई ३) यामध्ये अंतर्भूत असलेली ग्रामसभा ;

(घ) " अनुज्ञप्ती " म्हणजे मुंबई दारूबंदी अधिनियम, १९४९ अन्वये देशी दारू किरकोळ विक्रीसाठी देण्यात येणारी नमुना " सीएल-३ ", परमिट रुमसाठी नमुना " एफएल-३ ", बिअरबारसाठी नमुना " ई ", विदेशी दारू किरकोळ विक्रीसाठी नमुना " एफएल-२ " अनुज्ञप्ती ;

(च) " नगरपरिषद " म्हणजे महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती आणि औद्योगिक वसाहती अधिनियम, १९६५ (१९६५ चा महा. ४०) यामध्ये अंतर्भूत असलेली नगरपरिषद ;

(छ) " संघटना " म्हणजे मुंबई सार्वजनिक विश्वस्त अधिनियम, १९५० (१९५० चा मुंबई २९) अन्वये धर्मादाय आयुक्तांकडे नोंदणी करण्यात आलेली महिला संघटना, महिला मंडळ किंवा सामाजिक संघटना ;

(ज) " ग्रामपंचायत " म्हणजे मुंबई ग्रामपंचायती अधिनियम, १९५८ (१९५८ चा मुंबई ३) यामध्ये अंतर्भूत असलेली ग्रामपंचायत ;

(झ) " ठराव " म्हणजे संबंधित गावातील ग्रामपंचायतीने किंवा ग्रामसभेने किंवा महिला संघटना किंवा सामाजिक संघटना यांनी पारित केलेला ठराव.

३. **मद्य विक्रीची अनुज्ञप्ती बंद करण्याबाबत संघटनेने केलेला ठराव आणि त्यावरील कार्यवाही.**—(१) अधिनियमान्वये मंजूर करण्यात आलेल्या " सीएल-३ ", नमुना " एफएल-३ ", नमुना " ई ", नमुना " एफएल-२ " अनुज्ञप्तीमधून होत असलेल्या मद्य विक्रीमुळे परिसरात कायदा व सुव्यवस्थेचा प्रश्न निर्माण होऊन सामाजिक स्वास्थ्य बिघडण्याची शक्यता आहे. या कारणास्तव जर संघटनेने त्यांच्या घटनेच्या अटी व शर्तीनुसार अशी अनुज्ञप्ती बंद करण्याचा ठराव पारित करून सदर ठराव संबंधित जिल्हाधिकारी यांना पाठविल्यास सदर तक्रारीच्या अनुषंगाने जिल्हाधिकारी यांनी संबंधित अनुज्ञप्ती विरुद्ध आवश्यक ती कार्यवाही सुरू करावी.

(२) जिल्हाधिकारी यांना वरील उप खंड (१) मध्ये नमूद केल्याप्रमाणे ठराव/तक्रारी प्राप्त झाल्यानंतर संबंधित अनुज्ञप्ती विरुद्ध उक्त अधिनियमाच्या कलम ५४ व ५६ अन्वये कारवाई करण्यात यावी.

४. **ग्रामपंचायत/ग्रामसभा इत्यादींनी मद्य विक्रीची दुकाने बंद करण्यासाठी केलेला ठराव.**—(१) ग्रामसभेत किमान ५० टक्के मतदार उपस्थित राहून साध्या बहुमताने विधीवत ठराव पारित केल्यास, सदर ठरावानुसार जिल्हाधिकारी यांनी अशी मद्य विक्रीची अनुज्ञप्ती बंद करावी असा कोणताही ठराव हा मुंबई ग्रामपंचायत अधिनियम, १९५८ आणि त्याखालील तयार करण्यात आलेल्या नियमातील तरतुदीनुसार विधीवत झालेला असला पाहिजे. परंतु ग्रामसभेने अशा रीतीने ठराव पारित केल्यानंतर ग्रामसभेच्या ठरावा विरुद्ध ग्रामपंचायतीने याबाबत कोणताही ठराव पारित केल्यास तो विचारात घेण्यात येऊ नये. तसेच कालांतराने ग्रामसभेनेही बंद करण्यात आलेली मद्य विक्रीची अनुज्ञप्ती पुन्हा चालू करण्याबाबत ठराव पारित केल्यास अशा प्रकारचा ठराव विचारात घेण्यात येऊ नये.

(२) जर, संबंधित गावातील २५ टक्के पेक्षा कमी नसलेल्या महिला मतदारांनी संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडे लेखी निवेदनाद्वारे त्या गावातील मद्य विक्रीची अनुज्ञप्ती बंद करण्याबाबत मागणी केल्यास, जिल्हाधिकारी संबंधित तहसीलदार यांना सोबत जोडलेल्या नमुना मतदानपत्रिकेचा वापर करून निर्भयपणे व गुप्त पद्धतीने मतदान घेण्याबाबतचे निर्देश देतील. त्यानंतर संबंधित तहसीलदार हे मतदानाचे ठिकाण, तारीख व वेळ याबाबतची पूर्वसूचना संबंधित गावात किमान ७ दिवस अगोदर जाहीर करतील. सदर मतदानासाठी अद्ययावत (latest) मतदार यादी वापरण्यात यावी. तहसीलदार किंवा त्यांनी प्राधिकृत केलेला नायब तहसीलदार यांच्यापेक्षा कमी दर्जा नसलेला अधिकारी यांच्या पर्यवेक्षणाखाली महिला मतदारांचे गुप्त पद्धतीने मतदान घेण्याची प्रक्रिया पूर्ण करण्यात यावी. जर त्या गावातील एकूण महिला मतदारांच्या संख्येच्या किमान ५० टक्क्यांपेक्षा अधिक महिला मतदारांनी मद्य विक्रीची अनुज्ञप्ती बंद करण्याबाबतच्या बाजूने मतदान केल्यास अशी मद्य विक्रीची अनुज्ञप्ती जिल्हाधिकारी यांनी बंद करावी.

(३) जर, नगरपरिषद/महानगरपालिका क्षेत्रातील एखाद्या वार्डातील २५ टक्केपेक्षा कमी नसलेल्या महिला मतदारांनी संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडे लेखी निवेदन देऊन संबंधित वार्डातील मद्य विक्रीची अनुज्ञप्ती बंद करण्याची मागणी केल्यास जिल्हाधिकारी, यथास्थिति, संबंधित मुख्याधिकारी/उप आयुक्त यांना सोबत जोडलेल्या मतदानपत्रिकेचा वापर करून निर्भयपणे व गुप्त पद्धतीने मतदान घेण्याचे निर्देश देतील. तद्नंतर यथास्थिति, संबंधित मुख्याधिकारी/उप आयुक्त हे मतदानाचे ठिकाण, तारीख व वेळ याबाबतची पूर्वसूचना त्या वार्डात किमान ७ दिवस अगोदर जाहीर करतील. सदर मतदानासाठी अद्ययावत (latest) मतदार यादी वापरण्यात यावी. यथास्थिति, मुख्याधिकारी/उप आयुक्त किंवा त्यांनी प्राधिकृत केलेला अनुक्रमे उप मुख्याधिकारी/सहाय्यक आयुक्त यांच्यापेक्षा कमी दर्जाचा नसलेला अधिकारी यांच्या पर्यवेक्षणाखाली त्या वार्डातील महिला मतदारांचे गुप्त पद्धतीने मतदान घेण्याची प्रक्रिया पूर्ण करण्यात यावी. जर, संबंधित वार्डातील एकूण महिला मतदारांच्या संख्येच्या किमान ५० टक्क्यांपेक्षा अधिक महिला मतदारांनी मद्य विक्रीची अनुज्ञप्ती बंद करण्याच्या बाजूने मतदान केल्यास त्या वार्डातील संबंधित मद्य विक्रीची अनुज्ञप्ती बंद करण्याचे आदेश जिल्हाधिकारी यांनी द्यावेत.

(४) जर, संबंधित गावातील किंवा नगरपरिषद/महानगरपालिका असल्यास संबंधित वार्डातील २५ टक्केपेक्षा कमी नसलेल्या मतदारांनी मद्य विक्रीची अनुज्ञप्ती बंद करण्याबाबत लेखी निवेदनाद्वारे संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडे मागणी केल्यास, जिल्हाधिकारी, यथास्थिति, संबंधित तहसीलदार/मुख्याधिकारी/उप आयुक्त यांना सोबत जोडलेल्या मतदानपत्रिकेचा वापर करून निर्भयपणे व गुप्त पद्धतीने मतदान घेण्याचे निर्देश देतील. तद्नंतर यथास्थिति, संबंधित तहसीलदार/मुख्याधिकारी/उप आयुक्त हे मतदानाचे ठिकाण, तारीख व वेळ याबाबतची पूर्वसूचना त्या गावात/वार्डात किमान ७ दिवस अगोदर जाहीर करतील. सदर मतदानासाठी अद्ययावत (latest) मतदार यादी वापरण्यात यावी. तहसीलदार/मुख्याधिकारी/उप आयुक्त यांच्या किंवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अनुक्रमे नायब तहसीलदार/उप मुख्याधिकारी/सहाय्यक आयुक्त यांच्यापेक्षा कमी दर्जाचा नसलेला अधिकारी यांच्या पर्यवेक्षणाखाली त्या गावातील/वार्डातील मतदारांचे गुप्त पद्धतीने मतदान घेण्याची प्रक्रिया पूर्ण करण्यात यावी जर, यथास्थिति, संबंधित गावातील अथवा नगरपरिषद/ महानगरपालिका असल्यास संबंधित वार्डातील एकूण मतदारांच्या किमान ५० टक्क्यांपेक्षा अधिक मतदारांनी मद्य विक्रीची अनुज्ञप्ती बंद करण्याबाबत मतदान केल्यास सदरची मद्य विक्रीची अनुज्ञप्ती जिल्हाधिकारी यांनी बंद करावी.

५. **प्राप्त झालेला ठराव किंवा निवेदनावरील कार्यवाही पूर्ण करण्यासाठीचा कालावधी.**—संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी त्यांच्याकडे मद्य विक्रीची अनुज्ञप्ती बंद करण्याबाबत निवेदन प्राप्त झाल्यानंतर आवश्यक ती अंतिम कार्यवाही एक महिन्याच्या आत पूर्ण करतील. जर, कोणत्याही कारणास्तव एक

महिन्यात अंतिम कार्यवाही पूर्ण करणे शक्य नसल्यास, जिल्हाधिकारी यांनी संपूर्ण समर्थनासह आयुक्त (राज्य उत्पादन शुल्क) यांना मुदतवाढीकरिता पूर्वमान्यता घेण्यासाठी प्रस्ताव सादर करावा.

६. **मतदानाच्या जागेची निवड.**—यथास्थिति, तहसीलदार/मुख्याधिकारी/उप आयुक्त हे मतदानाच्या जागेची निवड करून जागा निश्चित करतील. परंतु, अशा जागेची निवड करताना ग्रामपंचायत/नगरपरिषद/महानगरपालिकेच्या निवडणुकीच्या मतदानासाठी ज्या तत्वावर मतदानाची जागा निवडली जाते, त्या तत्वावर जागेची निवड करावी.

७. **मतदानाची जागा, तारीख व वेळ जाहीर करणे.**—(१) जर, संबंधित गावातील मद्यविक्रीची अनुज्ञप्ती बंद करण्याबाबत जिल्हाधिकारी यांनी गुप्त मतदान घेण्याचा निर्णय घेतला तर त्या गावातील मतदानाचे ठिकाण, तारीख व वेळ याबाबतची सूचना किमान ७ दिवस अगोदर संबंधित गावातील ग्रामपंचायत कार्यालयातील सूचना फलकावर लावण्यात यावी. त्याचप्रमाणे सदर माहिती गावात दवंडी देऊनही जाहीर करण्यात यावी.

(२) त्याचप्रमाणे जर, संबंधित नगरपरिषद/महानगरपालिका वार्डातील मद्यविक्रीची अनुज्ञप्ती बंद करण्याबाबत जिल्हाधिकारी यांनी गुप्त मतदान घेण्याचा निर्णय घेतला तर संबंधित नगरपरिषद/महानगरपालिका वार्डातील मतदानाचे ठिकाण, तारीख व वेळ याबाबतची सूचना किमान ७ दिवस अगोदर संबंधित वार्ड कार्यालय आणि नगरपरिषद/महानगरपालिकेचे मुख्य कार्यालय येथील सूचना फलकावर लावण्यात यावी.

(३) गुप्त मतदानाची वेळ सकाळी ०८-०० ते दुपारी ०२-०० वाजेपर्यंत ठेवण्यात यावी.

८. **मतमोजणीचे ठिकाण, तारीख आणि वेळ जाहीर करणे.**—(१) यथास्थिति, तहसीलदार/मुख्याधिकारी/उप आयुक्त यांनी मतमोजणीचे ठिकाण, तारीख व वेळ याबाबतची पूर्वसूचना मतदानाच्या तारखेच्या किमान ७ दिवस अगोदर संबंधित ग्रामपंचायत किंवा संबंधीत वार्ड कार्यालय आणि नगरपरिषद/महानगरपालिकेचे मुख्य कार्यालय येथील सूचना फलकावर लावण्यात यावी. त्याचप्रमाणे सदर माहिती गावात दवंडी देऊनही जाहीर करण्यात यावी.

(२) मतमोजणी ही मतदानाच्या दिवशी दुपारी ४-०० वाजता सुरू करण्यात यावी.

(३) गावातील मतमोजणीची प्रक्रिया ही तहसीलदार किंवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या नायब तहसीलदार यांच्यापेक्षा कमी दर्जा नसलेल्या अधिकाऱ्याच्या पर्यवेक्षणाखाली पूर्ण करण्यात यावी. नगरपरिषद/महानगरपालिका वार्डातील मतमोजणीची प्रक्रिया ही मुख्याधिकारी/उप आयुक्त किंवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अनुक्रमे उप मुख्याधिकारी/सहायक आयुक्त यांच्यापेक्षा कमी दर्जा नसलेल्या अधिकाऱ्याच्या पर्यवेक्षणाखाली पूर्ण करण्यात यावी.

(४) तहसीलदार/मुख्याधिकारी/उप आयुक्त यांनी मतमोजणीचा निकाल मतमोजणीनंतर तात्काळ जाहीर करावा व जिल्हाधिकारी यांना अहवाल त्वरित सादर करावा.

९. गुप्त मतदानासाठी मतपत्रिकेचा नमुना—

| | |
|---|---|
| (१) गावाचे नाव/(महानगर पालिका/नगरपरिषद असल्यास, वार्डाचे नाव) | |
| (२) सीएल-३/एफएल-२/एफएल-३/नमुना " ई " अनुज्ञप्ती धारकाचे नाव/ .. अनुज्ञप्तीवरील फर्मचे नाव .. | |
| (३) मतदानाची तारीख व वेळ .. | |
| **मद्य विक्री अनुज्ञप्ती चालू ठेवावी.** |  |
| **मद्य विक्री अनुज्ञप्ती बंद करावी.** |  |

मतदान अधिकाऱ्याची सही.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**ना. उ. रौराळे,**
शासनाचे अवर सचिव.

# HOME DEPARTMENT

Mantralaya, Mumbai 400 032, dated the 30th June 2003

## Order

BOMBAY PROHIBITION ACT, 1949.

No. LAQ. 1094/108890/(Assu-235). EXC-3.—In exercise of the powers conferred by sub-section (*1*) of section 139 of the Bombay Prohibition Act, 1949 (Bom. XXV of 1949), read with sub-section (2) of section 139 of the said Act and of all other powers enabling it in this behalf, and in supersession of all Government Orders No. BPA. 1293/229/EXC-3, dated the 14th July 1993, No. BPA. 1293/229EXC-3, dated the 11th October 1993, No. BPA. 1293/229/ EXC-3, dated the 29th December 1993, No. BPA. 1294/229/EXC-3, dated the 30th July 1994, No. BPA. 1294/229/EXC-3, dated the 23rd November 1994, No. BPA. 1294/229/EXC-3, dated the 1st January 2001, No. LAQ. 1094/ 108890/EXC-3, dated the 19th September 2002 and No. LAQ. 1094/108890/ (Assu-235)/EXC-3, dated the 21st September 2002, the Government of Maharashtra is pleased to make the following Order, namely :—

1. Short title.—This Order may be called the Bombay Prohibition (Closer of License on Resolution by the Village *Panchayat* or *Gram Sabha* or Women/ Social Organisation or representation by Voters in the Village or Ward of Municipal Council/Corporation) Order, 2003.

2. *Definition.*—In this Order, unless the context requires otherwise,—

(*a*) „Act „ means the Bombay Prohibition Act, 1949 (Born. XXV of 1949) ;

(*b*) " Corporation " means a Corporation under the Bombay Provincial Municipal Corporations Act, 1949 (Bom. LIX of 19491, the Bombay Municipal Corporation Act, (Bom. III of 1888), or the City of Nagpur Corporation Act, 1949 (C. P. and Berar II of 1950) ;

(*c*) "*Gram Sabha*" means *Gram Sabha* under the Bombay Village Panchayats Act, 1958 (Bom. III of 1959) ;

(*d*) "license" means a license for the retail sale of country liquor in Form CL-III, permit room in Form FL-III, beer bar in Form E, retail sale of foreign liquor in Form FLII granted under the Bombay Prohibition Act, 1949;

(*e*) "Municipal Council" means a Municipal Council under the Maharashtra Municipal Councils, Nagar Panchayats and Industrial Township Act, 1985 (Mah. XL of 1965) ;

(*f*) " Organisation " means women organisation, Mahila Mahdal or social organisation registered with the Charity Commissioner under the Bombay Public Trusts Act, 1950 (Bom. XXIX of 1950);

(*g*) " Village Panchayat " means a " Village Panchayat " under the Bombay Village panchayat Act, 1958 (Bom. III of 1959);

(*h*) " resolution " means a resolution passed by the Village Panchayat or Gram Sabha or Women Organisation or Social Organisation in the concerned Village.

**3.** *Resolution* by Organisation for closing down of liquor shop and actwn *thereon.*—(1) Where the resolution by the Organisation, as per the terms and conditions of the constitution of the concerned Organisation is passed for closing down the liquor shop having Country Liquor License in Form CL-III, Permit Room License in Form FL-III, Beer Bar License in Form E, Foreign Liquor License in Form FL-II Under the Act, on the ground that, it has become nuisance in that locality and due to consumption 'of excess liquor many health problems and law and order problems are created, the Organisation shall send the resolution to the concerned Collector as a complaint agaist the liquor shop having such license to initiate against such liquor shop the necessary action.

(2) The Collector on receipt of such resolution/complaint under sub-clause (1) above shall initiate the necessary action against such liquor shop under sections 54 and 56 of the Act.

**4.** Resolution by Village *Panchayat / Gram* Sabha etc., for closing *down of* liquor *shop.*—(1) The Collector shall close down such liquor shop if, the Village Panchayat passes a resolution for closing down the loquor shop, or not less than 50 per cent. of the voters present in the Gram Sabha pass the resolution by a simple majority for closing down the liquor shop. Any such resolution shall be passed in accordance with the Bombay Village Panchayats Act, 1958 and rules made thereunder. The Collector shall not take into consideration the resolution passed by the concerned Village Panchayat against the resolution of the Gram Sabha or the resolution passed by the Gram Sabha after some time, to continue such liquor shop.

(2) If, not less than 25 per cent. of the women voters in the-village concerned give a representation in writing to the concerned Collector and demand to close down the liquor shop in such village, the Collector shall direct the Tahsildar to take secret poll fearlessly by utilising a specimen ballot paper appended herewith. Thereafter, the Tuhsildar shall declare the place, date and time of election at least seven days in advance. The latest list of voters shall be used for such election. The election process of women

voters shall be completed by secret ballot under the supervision of Tahsildar or an officer not below the rank of Naib Tahsildar authorised by him. If, in such election more than 50 per cent. of the women voters of that village vote for closing down the liquor shop, the Collector shall pass an order for closing down such liquor shop.

(3) If, not less than 25 per cent. of the women voters in any ward of the Municipal Council or Corporation give a representation in writing to the concerned Collector and demand to close down the liquor shop in the area of the ward, the Collector shall direct the concerned Chief Officer/Deputy Commissioner, as the case may be, to take secret poll fearlessly by utilising a specimen ballot paper appended herewith. Thereafter, the Chief Officer/ Deputy Commissioners, as the case may be, shall declare the place, date and time of election at least seven days in advance. The latest list of voters shall be used for such election. The election process of women voters of that ward shall be completed by secret ballot under the supervision of the Chief Officer/ Deputy Commissioner or an officer not below the rank of Deputy Chief Officer/Assistant Commissioner respectively authorised by the Chief Officer or Deputy Commissioner, as the case may be. If, in such election more than 50 per cent. of the women voters of that ward vote for closing down the liquor shop, the Collector shall pass an order for closing down such liquor shop.

(4) If, not less than 26 per cent. of the total voters in the village concerned or the ward concerned of the Municipal Council or Corporation gives a representation in writing to the concerned Collector and demand to close down the liquor shops in such area, the Collector shall direct the concerned Tahsildar/Chief Officer/Deputy Commissioner, as the case may be, to take secret poll fearlessly by utilising a specimen ballot paper appended herewith. Thereafter, the Tahsildar/Chief Officer/Deputy Commissioner, as the case may be, shall declare the place, date and time of election at least seven days in advance. The Latest list of voters shall be used for such election. The election process of voters of that village or ward shall be completed by secret ballot under the supervision of the Tahsildar/Chief Officer/Deputy Commissioner, or an officer not below the rank of Naib Tahsildar/Deputy Chief Officer/Assistant Commissioner respectively authorised by the Tahsildar/Chief Officer/Deputy Commissioner, as the case may be. If, in such election more than 50 per cent. of the voters of that village or ward, as the case may be, vote for closing down the liquor shops, the Collector shall pass an order for closing down such liquor shop.

**5.** Time for completion of action on resolution or representation received.—After receiving the resolution or representation for closing down the liquor shop, the concerned Collector shall complete the necessary final

action within one month from the date of receipt of such resolution or representation. If, for any reason it is not possible for the Collector to complete the final action within the said period of one month, the Collector shall send the proposal to the Commissioner of State Excise for obtaining from him the prior permission for extending the period after giving full justification for such extension of period.

6. Selection of *Place of voting*.—The Tahsildarl Chief Officer/Deputy Commissioner, as the case may be, shall select and fix the place of voting. However, the selection of the place for voting shall be made on the norms on which the place for voting for elections of the Village *Panchayat*/Municipal Council/Municipal Corporation is to be selected.

7. Declaration of the *place*, date and time *of poll*.—(1) If, the Collector has decided to take secret poll to close down the liquor shop in the village, the place, date and time of poll shall be published on the notice board of the *Vilage* Panchayat at least seven days in advance of the date of election and the information of such place, date and time shall also be given to the villagers by beating of drum.

(2) If the Collector has decided to take secret poll to close down the liquor shop in any ward of the Municipal Council or Corporation, the place, date and time of poll shall be published on the notice board of the ward office and also of the Head Office of the concerned Municipal Council or Corporation at least seven days in advance of the date of election.

(3) The voting time shall be from 8.00 a.m. to 2.00 p.m.

8. *Declaration of the place, date and time of counting*.—(1) The *Tahsildar*/ Chief Officer/Deputy Commissioner, as the case be, shall publish the place, date and time of counting on the notice board of the Village Panchayat concerned or of the ward office concerned and also of the Head Office of the Municipal Council/Corporation concerned, at least seven days in advance of the date election. The information of such place, date and time of counting shall also be given to the villagers by beating of drum.

(2) Counting shall be started at 4.00 p.m. on the date of election.

(3) Counting process shall be completed under the supervision of the Tahsildar or an officer not below the rank of Naib Tahsildar authorised by him in case of the election in the village, or the Chief Officer/Deputy Commissioner, or an officer not below the rank of Deputy Chief Officer/ Assistant Commissioner respectively authorised by the Chief Officer or Deputy Commissioner, as the case may be, in case of election in ward of the Municipal Council, or, as the case may be, of the Corporation.

(4) The Tahsildar/Chief Officer/Deputy Commissioner, as the case may be, shall declare the result after completion of the counting of votes and shall submit the report to the Collector immediately.

9. Specimen Ballot *Paper*——

| | |
|---|---|
| (1) Name of the Village/(Name of the Ward in case of Municipal Corporation/Municipal Council). Name of the CL-III/FL-II/ | |
| (2) Form-E licensee/Name of Firm | |
| (3) Date and Time of Voting. | |
| Licence to be continue |  |
| Licence not tu be continue |  |

Signature of the Polling Officer,

By order and in the name of the Governor of Maharashtra,

**N. U. RAURALE,**
Under Secretary to Government.

शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई